औरंगाबाद विभागातील अनुदानित
वसतिगृहांच्या मान्य विद्यार्थी संख्या वाढीस
मंजूरी देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीसीएच-२०१४/प्र.क्र.१३२/शिक्षण -२
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक : २७ ऑगस्ट, २०१४.

वाचा -

१) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतीक कार्य व क्रीडा विभाग, क्र.बीसीएच-१०९७/प्र.क्र.१०५/मावक-४, दि. १६ मार्च, १९९८
२) शासन निर्णय क्रमांक:- बीसीएच-२००८/प्र.क्र.६६९/मावक-४, दि. ३ डिसेंबर, २००८
३) शासन शुध्दिपत्रक क्रमांक:- बीसीएच-२०१२/प्र.क्र.१२५/मावक-४, दि.३ सप्टेंबर,२०१२
४) आयुक्त, समाजकल्याण पुणे यांचे पत्र क्र.सकआ/शिक्षण/अनुवगृह / मासंवा/ का-५/प्र.क्र./२०१३-१४/ ३८६, दि.१०/०२/२०१४
५) आयुक्त, समाजकल्याण पुणे यांचे पत्र क्र.सकआ/शिक्षण/अनुवगृह / मासंवा/बीड/का-५/प्र.क्र.३७०/२०१४-१५/१८०५, दि.२३/०७/२०१४
६) आयुक्त, समाजकल्याण पुणे यांचे पत्र क्र.सकआ/शिक्षण/अनुवगृह / मासंवा/का-५/प्र.क्र.३४/२०१३-१४/५४७, दि.२५/०२/२०१४
७) आयुक्त, समाजकल्याण पुणे यांचे पत्र क्र.सकआ/शिक्षण/अनुवगृह / मासंवा/का-५/प्र.क्र. /१४-१५/१९४३, दि.०६/०८/२०१४
८) आयुक्त, समाजकल्याण पुणे यांचे पत्र क्र.सकआ/शिक्षण/अनुवगृह / मासंवा/का-५/प्र.क्र. /१४-१५/१९२६, दि.०६/०८/२०१४

प्रस्तावना -

संदर्भाधिन अनु क्र.१ येथील शासन निर्णयान्वये राज्यातील मागासवर्गीय अनुदानित वसतिगृहांना मान्यता व अनुदान ही योजना राबविण्यात येते. या शासन निर्णयातील जोडपत्र-अ मधील नियम क्रमांक ८ (ग) नुसार मान्यता प्राप्त अनुदानित मागासवर्गीय वसतिगृहातील विद्यार्थ्यांच्या मंजूर संख्येत वाढ करण्याची तरतूद आहे. त्यास अनुसरुन औरंगाबाद विभागातील स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या मागासवर्गीय अनुदानित मुला-मुलींच्या वसतिगृहांची मान्य विद्यार्थी संख्या वाढ करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय-

उपरोक्त प्रस्तावांचा सखोल विचार करुन तसेच औरंगाबाद विभागातील बीड जिल्ह्यातील शिल्लक १२० विद्यार्थी संख्या विचारात घेऊन औरंगाबाद विभागातील खालीलप्रमाणे अनुदानित मुला-मुलींच्या वसतिगृहांना विद्यार्थी संख्या वाढवून देण्यास शासन मान्यता देत आहे :-

| अ.क्र. | वसतिगृहाचे नाव | मंजूर विद्यार्थी संख्या | वाढवून देण्यातआलेली विद्यार्थी संख्या | वाढीनंतर होणारी एकूण विद्यार्थी संख्या |
|---|---|---|---|---|
| १. | भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर शिक्षण प्रसारक मंडळ, इटोली, ता.जिंतूर, जि. परभणी संचलित राधा गोविंद मागासवर्गीय मुलींचे वसतिगृह, इटोली, ता.जिंतूर, जि. परभणी | २४ | २० | ४४ |
| २. | रेणुकामाता कृषी विकास प्रतिष्ठान, देवगाव, ता.केज, जि.बीड संचलित रेणुकामाता मागासवर्गीय विद्यार्थी वसतिगृह, शिंदी, ता.केज, जि.बीड | २४ | २० | ४४ |
| ३. | विठ्ठलगड शिक्षण प्रसारक मंडळ, सारणी (सा.), ता.केज, जि.बीड संचलित राजा हनुमान मागासवर्गीय विद्यार्थी वसतिगृह, विडा, ता.केज, जि.बीड | २४ | २० | ४४ |
| ४. | बंजारा विकास सेवा संघ, गोळेगाव (तांडा), ता.गेवराई, जि.बीड संचलित कै. वसंतराव नाईक मागासवर्गीय मुलांचे वसतिगृह, गेवराई, जि.बीड | ३० | १८ | ४८ |
| ५. | नॅशनल एज्युकेशन सोसायटी, सिल्लोड, ता. सिल्लोड, जि.औरंगाबाद संचलित नॅशनल मागासवर्गीय विद्यार्थी वसतिगृह, सिल्लोड, ता. सिल्लोड, जि.औरंगाबाद | २४ | १८ | ४२ |
| ६. | वाल्मिकी शिक्षण प्रसारक मंडळ, परभणी, जि. परभणी संचलित श्रीमती शांताबाई नखाते मागासवर्गीय मुलांचे वसतिगृह, रामपुरी (खु), ता.पाथरी, जि.परभणी | २४ | १८ | ४२ |
| ७. | रेणुकामाता कृषी विकास प्रतिष्ठान, देवगाव, ता.केज, जि.बीड संचलित ज्ञानोबा मुंडे मागासवर्गीय विद्यार्थी वसतिगृह, देवगाव, ता.केज, जि.बीड | ४२ | ०६ | ४८ |

२. या योजनेकरीता सध्या अस्तित्वात असलेल्या शासन निर्णय दि. १६ मार्च, १९९८ मधील तरतूदीप्रमाणे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद/ परभणी/ बीड यांनी अनुदान निर्धारण करण्याबाबत योग्य ती कार्यवाही करावी. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद औरंगाबाद/ परभणी/ बीड यांनी प्रतिवर्षी त्यांना नियमानुसार मंजूर करण्यात येणाऱ्या आर्थिक तरतूदीमधून हा खर्च भागविणे आवश्यक राहील.

३. हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२७१३३०३१३१२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Gopal Mane

Digitally signed by Vasant Gopal Mane
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Gopal Mane
Date: 2014.09.03 14:47:57 +05'30'

**डॉ.वसंत माने**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
२. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, औरंगाबाद
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद/ परभणी/ बीड
५. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद/ परभणी/ बीड
६. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद/ परभणी/ बीड
७. जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद/ परभणी/ बीड
८. सचिव/अध्यक्ष, भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर शिक्षण प्रसारक मंडळ, इटोली, ता.जिंतूर, जि. परभणी
९. सचिव/अध्यक्ष, रेणुकामाता कृषी विकास प्रतिष्ठान, देवगाव, ता.केज, जि.बीड
१०.सचिव/अध्यक्ष, विठ्ठलगड शिक्षण प्रसारक मंडळ, सारणी (सा.), ता.केज, जि.बीड
११.सचिव/अध्यक्ष, बंजारा विकास सेवा संघ, गोळेगाव (तांडा), ता.गेवराई, जि.बीड
१२.सचिव/अध्यक्ष, नॅशनल एज्युकेशन सोसायटी, सिल्लोड, ता. सिल्लोड, जि.औरंगाबाद
१३.सचिव/अध्यक्ष, वाल्मिकी शिक्षण प्रसारक मंडळ, परभणी, जि. परभणी
१४.निवड नस्ती.